हरित परिवहन या बाबी अंतर्गत महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळातील ५००० डिझेल बसेसचे द्रवरुप नैसर्गिक वायू इंधनावरील वाहनांमध्ये रुपांतरण व देखभाल करण्यास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. :- एसटीसी-०५२४/प्र.क्र.४३/परि-१**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २६ ऑगस्ट, २०२४.

संदर्भ :- १) संचालक मंडळाची ३०३ वी दि.२२.११.२०२३ रोजी झालेली बैठक.
२) उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई यांचे पत्र क्र. राप/उपा व व्यसं/यंअ/एलएनजी/१७३५, दिनांक.१०.०७.२०२४.

**प्रस्तावना :-**

सन २०२३-२०२४ या वर्षाच्या अर्थसंकल्पीय भाषणावेळी तत्कालीन मा.उप मुख्यमंत्री (वित्त) यांनी हरित परिवहन या बाबी अंतर्गत- **"५ हजार डिझेल बसेसचे द्रवरुप नैसर्गिक वायू इंधनावरील वाहनांमध्ये रुपांतर करण्यात येईल"** असे जाहिर केले आहे. त्यानुसार महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाच्या दि.२२.११.२०२३ रोजी झालेल्या ३०३ व्या बैठकीमध्ये महामंडळ ठराव क्र. २०२३:११:०६ दि.२२.११.२०२३ अन्वये रा.प. महामंडळाच्या एकूण ५००० डिझेल इंधनावर चालणाऱ्या वाहनांचे लिक्विफाईड नॅचरल गॅस (LNG) या पर्यायी इंधनावर चालणाऱ्या वाहनांमध्ये रुपांतरण करण्याबाबत स्त्रोत निश्चिती करुन, प्रति बस रु.१९.४० लाख प्रमाणे ५००० वाहनांसाठी एकूण रु.९७० कोटी निधी महाराष्ट्र शासनाकडे मागण्यास संचालक मंडळाने मंजूरी दिली आहे. त्यानुसार सदर बाबीकरीता सन २०२४-२०२५ मध्ये रु.४० कोटी, सन २०२५-२०२६, मध्ये रु.२०० कोटी, सन २०२६-२०२७ मध्ये रु.३७० कोटी व सन २०२७ - २०२८ मध्ये रु.३६० कोटी असा एकूण रु.९७०.०० कोटी इतका निधीचा आराखडा मंजूर करण्यात आला आहे.

**शासन निर्णय:-**

हरित परिवहन या बाबी अंतर्गत महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळातील ५००० डिझेल बसेसचे द्रवरुप नैसर्गिक वायू इंधनावरील वाहनांमध्ये रुपांतरण व देखभाल करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर बाबी करीता रा.प.महामंडळास खालील आराखड्याप्रमाणे निधीची आवश्यकता आहे :-

| अ.क्र. | वर्ष | निधी |
|---|---|---|
| १ | सन २०२४ - २०२५ | रु. ४० कोटी. |
| २ | सन २०२५ - २०२६ | रु. २०० कोटी |
| ३ | सन २०२६ - २०२७ | रु. ३७० कोटी. |
| ४ | सन २०२७ - २०२८ | रु. ३६० कोटी. |
| | **एकूण** | **रु.९७० कोटी** |

सदर रु.९७०.०० कोटी हा निधी "मागणी क्रमांक बी-३, ३०५५ मार्ग परिवहन ००-१९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपकामांना सहाय्य (००) (००) (०१) महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ बसस्थानकांचे आधुनिकीकरणांतर्गत बांधकाम व इतर सोयी सुविधा (३०५५ ००५२) ३५ भांडवली मत्तेच्या निर्मीतीकरीता अनुदान" या लेखाशिर्षाखाली त्या-त्या आर्थिक वर्षामध्ये उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून खर्च करण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २१५/२४/का.१४६१ दि.२४.०७.२०२४, व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ४३७/२०२४/व्यय-८, दि.०२.०८.२०२४ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०८२६१७५०२१६६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SARIKA ASHISH GANVIR

Digitally signed by SARIKA ASHISH GANVIR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=355d31d0cf7bf8d02352945a11a765b0f536fe1adfd0fff4aad6f9dd87f3d76b, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=D50DB68513E91376BA0547B675FDF1B1F3E1AB721046013C8F2C377536F96AC5, cn=SARIKA ASHISH GANVIR
Date: 2024.08.26 18:08:13 +05'30'

**( सारिका गणवीर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन , मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा. सभापती, महाराष्ट्र विधान परिषद यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई
५) मा.अध्यक्ष , महाराष्ट्र विधान सभा यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई
६) मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधान परिषद यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई
७) मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधान सभा यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई
८) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
९) अपर मुख्य सचिव (परिवहन), मंत्रालय, मुंबई.
१०) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
११) उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई.
१२) वित्तिय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई.
१३) महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
१४) महालेखापाल (वाणिज्यिक लेखा परिक्षा), मुंबई
१५) कक्ष अधिकारी (व्यय-८, अर्थ-११), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) कक्ष अधिकारी (अर्थ-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
१७) निवडनस्ती कार्यासन परि-१, गृह विभाग, मंत्रालय,मुंबई.